**श्री.बी.ए.ढेंगळे, प्राचार्य, गट-अ (क) व**
**श्री.एस.डी.शिंदे, मुख्याध्यापक गट-अ (क) यांना**
**<u>पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**क्रमांक : व्यशिअ-२०१०/(१९४/१०)/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक: २६ सप्टेंबर, २०१८.

<u>संदर्भ:-</u> १) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांचे पत्र क्र.१०/आस्था/२०१०/५१०, दि.३१.०८.२०१०.
२) श्री.बी.ए.ढेंगळे यांचे दि.०९.०६.२०१० रोजीचे निवेदन.
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.७८९(अ)/४८३६/२०६४/२०१८/चार, दि.०४.०९.२०१८.

## <u>आदेश</u>

शिक्षण व सेवायोजन विभाग, शा.नि., दि.२५.१.१९९१ अन्वये सरळसेवेने श्री.बी.ए. ढेंगळे यांची निवड होवून ते दि.१४.०२.१९९१ रोजी खात्यात महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां) (मुख्याध्यापक) या पदावर कार्यरत झालेले आहेत. तसेच सदर आदेशान्वये एस.डी.शिंदे यांचीही निवड होवून ते दि.०५.०३.१९९१ रोजी खात्यात महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां) मुख्याध्यापक या पदावर कार्यरत झालेले आहेत. श्री.शिंदे यांनी दि.२०.०३.१९९३ रोजी व श्री.ढेंगळे यांनी दि.१३.०२.१९९३ रोजी म.शि.सेवा वर्ग-२ (तां.) (मुख्याध्याक) या पदावरील परिविक्षाधीन कालावधी उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि., दि.२७.१०.१९९३ अन्वये समाधानकारक पूर्ण केलेले आहे. उच्च व तंत्र शिक्षण विभाग परिपत्रक दि.२५.११.१९९३ अन्वये महाराष्ट्र शिक्षण सेवा वर्ग-ब (तां.) या पदाची सेवाजेष्ठता यादी निर्गमित करण्यात आली. सदर सेवाजेष्ठता यादीमध्ये श्री.एस.डी.शिंदे यांचा अ.क्र.८७ व श्री.बी.ए.ढेंगळे यांचा अ.क्र.८८ असा आहे.

**२.** उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शा.नि., दि.४.८.१९९५ अन्वये श्री.शिंदे (अ.जा.) व श्री.ढेंगळे (अ.जा.) यांना सेवाकनिष्ठ असलेले श्री.के.एन.तुपगाडगे (दि.२५.११.१९९३ च्या परिपत्रकामधील से.ज्ये.यादीतील अ.क्र.११०), श्री.बी.एस.अडगळे (से.ज्ये.यादीतील अ.क्र.११३), श्री.एस.एस.कदम, (से.ज्ये.यादीतील अ.क्र.११४), श्री.ए.आर.रंगारी (से.ज्ये.यादीतील अ.क्र.११५), श्री.एस.एस.स्वाती (से.ज्ये.यादीतील अ.क्र.११६) (सर्व अ.जा.चे उमेदवार) अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा वर्ग-१ (अ) (क) या पदावर पदोन्नती देण्यात आली.

**३.** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२३.५.१९९४ नुसार परिविक्षाधीन कालावधीतील सेवा पदोन्नतीसाठी पूर्व अट म्हणून निम्न संवर्गात अनुभवासाठी ग्राह्य न धरण्याबाबत शासनाचे आदेश असल्यामुळे म.शि.सेवा वर्ग-१ (अ) (क) (तां) संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्यासाठी दि.२३.३.१९९५ रोजी झालेल्या पदोन्नती समितीच्या बैठकीत तयार करण्यात आलेल्या निवडसूचीत श्री.एस.डी.शिंदे व श्री.बी.ए.ढेंगळे यांचा पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही.

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१७.२.१९९७ अन्वये दि.२३.५.१९९४ च्या शासन निर्णयानुसार परिविक्षाधीन कालावधीतील सेवा पदोन्नतीसाठी निम्न संवर्गात पूर्व अट म्हणून

अनुभवासाठी ग्राह्य न धरण्याबाबतचे आदेश मागे घेण्यात आले व ज्या अधिकाऱ्यांचा दि.२३.५.१९९४ च्या शासन आदेशामुळे पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही, त्या अधिकाऱ्यांचा पदोन्नतीसाठी तातडीने विचार व्हावा व त्यांची पदोन्नती मूळ ज्येष्ठता कायम राखण्यात यावी, असे आदेश निर्गमित करण्यात आले. तथापि, म.शि.सेवा वर्ग-१ (अ) (क) (तां) संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्यासाठी दि.५.१२.१९९७ व दि.७.११.२००३ रोजी झालेल्या पदोन्नती समितीच्या बैठकीत तयार करण्यात आलेल्या निवडसूचीत अ.जा.साठी पद आरक्षित नसल्यामुळे श्री.शिंदे व श्री.ढेंगळे यांच्या नावाचा समावेश करण्यात आला नाही व पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही.

४. म.शि.सेवा वर्ग-१ (अ) (क) (तां) संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्यासाठी दि.५.११.२००७ रोजी झालेल्या पदोन्नती समितीच्या बैठकीत तयार करण्यात आलेल्या निवडसूचीत श्री.शिंदे व श्री.ढेंगळे यांच्या नावाचा अ.जा. प्रवर्गासाठी राखीव असलेल्या पदासाठी समावेश करण्यात आला व त्या अनुषंगाने शासन निर्णय दि.२४.११.२००८ अन्वये म.शि.सेवा वर्ग-१ (अ) (क) (तां) संवर्गात पदोन्नती देण्यात आली.

शासन निर्णय, दि.४.८.१९९५ अन्वये म.शि.सेवा वर्ग-१ (अ) (क) (तां) संवर्गात पदोन्नती दिलेल्या श्री.के.एन.तुपघाडगे यांनी दि.२.९.१९९५ (म.पू.) पासून व श्री.बी.एस.अडगळे यांनी दि.१९.९.१९९५ (म.पू.) पासून पदोन्नतीच्या पदाचा कार्यभार स्वीकारला आहे.

५. दरम्यानच्या काळात श्री.ढेंगळे यांनी शासन निर्णय दि.१७.२.१९९७ ची अंमलबजावणी करुन वर्ग-अ (क) (तां) या संवर्गात श्री.के.एन.तुपघाडगे यांचा मानीव दिनांक देवून पदोन्नती संवर्गात मूळ जेष्ठता कायम राखण्यात यावी म्हणून निवेदन सादर केले. त्यास अनुसरुन सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, दि.२.६.२००२ परिशिष्ट ब, अ.क्र.४ नुसार मानीव दिनांक हा एकास-एक तत्वावर देण्यात यावा असे नमूद केले आहे. त्या अनुषंगाने शासन निर्णय दि.४.८.१९९५ अन्वये पदोन्नत झालेल्या श्री.शिंदे व श्री.ढेंगळे यांच्यापेक्षा सेवा कनिष्ठ असलेल्या श्री.तुपघाडगे यांच्या पदोन्नतीचा मानीव दि.२.९.१९९५ हा श्री.शिंदे यांना व श्री.अडगळे यांच्या पदोन्नतीचा मानीव दिनांक दि.१९.९.१९९५ हा श्री.ढेंगळे यांना देण्याबाबतचा प्रस्ताव संचालनालयाने संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे.

६. आता, संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार श्री.एस.डी.शिंदे यांना श्री.तुपघाडगे यांच्या पदोन्नतीचा दि.२.९.१९९५ (रुजू दिनांक) व श्री.बी.ए. ढेंगळे यांना श्री.अडगळे यांच्या पदोन्नतीचा दि.१९.९.१९९५ (रुजू दिनांक) हे मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे. श्री.शिंदे व श्री.ढेंगळे यांना सन १९९४-९५ च्या निवडसूचीवर पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करण्याच्या अनुषंगाने त्यांना सेवाकनिष्ठ असलेले कर्मचारी श्री.तुपघाडगे व श्री.अडगळे यांचा पुढील निवडसूचीवर समोवश करुन निवडसूची सुधारित करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

७. श्री.बी.ए.ढेंगळे व श्री.एस.डी.शिंदे यांचा पदोन्नतीचा मानीव दिनांक ते गट-अ (कनिष्ठ) (तांत्रिक) या पदाचा प्रत्यक्ष कार्यभार स्वीकारल्याच्या दिनांक या कालावधीमध्ये काल्पनिक वेतननिश्चितीचा प्रत्यक्ष लाभ सदरहू दोन्ही अधिकाऱ्यांना गट-अ (कनिष्ठ) (तांत्रिक) या पदाचा कार्यभार प्रत्यक्ष घेतल्याच्या तारखेपासून अनुज्ञेय ठरेल, मानीव दिनांक मंजुरीच्या आनुषंगाने थकबाकीची (काल्पनिक वेतननिश्चितीचा परिणामी) रक्कम सदर दोन्ही अधिकाऱ्यांना देय ठरणार नाही.

८. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९२/२०१८, साप्रवि-१२,दि.१०.०४.२०१८ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२०५/१८,सेवा-३, दि.३.५.२०१८ अन्वये तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१८०९२६१७०३१५७१०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr.Manish Sheshrao Milke

Digitally signed by Dr.Manish Sheshrao Milke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=116b8d4fe32ec9c9f7698810f585f3247df16981777aa4a590ca4347b30d6d0c, cn=Dr.Manish Sheshrao Milke
Date: 2018.09.26 17:08:10 +05'30'

**( डॉ.मनिष शे.मिलके )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्री.बी.ए.ढेंगळे, निरीक्षक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, अमरावती.
२) श्री.एस.डी.शिंदे, प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पंढरपूर, जि.सोलापूर.
३) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई-१.
४) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, अमरावती/ पुणे.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/सोलापूर.
८) उपकोषागार अधिकारी, पंढरपूर, जि.सोलापूर.
९) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पंढरपूर, जि.सोलापूर.
१०) निवडनस्ती (व्यशि-१).